राज्य शासनाच्या अखत्यारीतील गट "क" आणि "ड" पदांवरील सेवाभरती करण्यासाठी गठीत करण्यात आलेल्या /करावयाच्या निवड समित्यांवर अ.जा/अ.ज/ इ.मा.व, अल्पसंख्यांक व महिलांना प्रतिनिधीत्व देणेबाबत

**महाराष्ट्र शासन.**

सामान्य प्रशासन विभाग

शासन परिपत्रक क्रमांक-संकीर्ण १००४/४०७/प्र.क्र.३७/२००४/१३-अ,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक :- १० डिसेंबर,२००४

**-: परिपत्रक :-**

केंद्र शासनाच्या कार्मिक विभागाच्या कार्यालयीन आदेश क्रमांक:-३९०१६/९ (एस)/ ८९-आस्था (बी), दिनांक १६/८/१९९० व क्रमांक ४२०११/ १५/९५-आस्था (एससीटी ), दिनांक ११/७/१९९५ मधील तरतूदीनुसार गट "क" व "ड" मधील पदांवर भरती करताना उमेदवारांच्या निवडीकरीता गठीत केलेल्या / करावयाच्या निवड समित्यांवर अ.जा./अ.ज./इ.मा.व. यामधून एक प्रतिनिधी व अल्पसंख्यांकामधून एका प्रतिनिधीची नियुक्ती करणे अनिवार्य करण्यात आले आहे. तसेच निवड समितीमधील सर्वसाधारण प्रवर्गामधून किंवा अल्पसंख्याकांमधून किंवा अजा/अज/इ.मा.व. यापैकी कोणत्याही एका प्रवर्गातील एक प्रतिनिधी महिला अधिकारी असणे अनिवार्य करण्यात आले आहे.

२. केंद्र शासनाच्या उपरोक्त कार्यालयीन आदेशातील तरतूदी विचारात घेऊन असे आदेश देण्यात येत आहेत की,राज्य शासनाच्या अखत्यारीतील गट "क" आणि "ड" मधील पदांवर नियुक्त्या करताना गठीत करण्यात आलेल्या / करावयाच्या निवड समित्यांवर अ.जा./ अ.ज./इ.मा.व.यामधुन एक प्रतिनिधी व अल्पसंख्याकांमधुन एका प्रतिनिधीची नियुक्ती करण्यात यावी. तसेच अशा निवड समितीमध्ये सर्वसाधारण प्रवर्ग किंवा उपरोक्त प्रवर्गापैकी कोणत्याही प्रवर्गामधील एक प्रतिनिधी महिला असणे अनिवार्य आहे.

३. सर्व मंत्रालयीन विभागांना विनंती करण्यात येते की, त्यांनी वरील आदेश त्यांच्या प्रशासकीय अधिपत्याखालील सर्व कार्यालयांना / नियुक्ती प्राधिका-यांना कळवावे आणि या आदेशांची काटेकोरपणे अमलबजावणी केली जाईल याबाबत दक्षता घ्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(अ.बा. घरत)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

राज्यपाल यांचे प्रधान सचिव,राजभवन, मुंबई,
मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय, मुंबई,
उपमुख्य मंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय, मुंबई,

रोटा/एच–783(4500–12–04)–1

(कृ.मा.प.

सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, राज्य निवडणुक आयोग, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मुळ न्यायशाखा, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
* प्रबंधक, लोकआयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ), १/२, महाराष्ट्र , मुंबई / नागपूर,
महालेखापाल ( लेखा परिक्षा ), १/२, महाराष्ट , मुंबई / नागपूर ,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ,
निवासी लेखा अधिकारी, मुंबई ,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व मंत्रालयीन विभाग,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई ( प्रसिध्दी पत्रक काढण्यासाठी ),
मंत्रालयीन विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली असलेले सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
मंत्रालय- मध्यवर्ती ग्रंथालय, मंत्रालय, मुंबई ( २ प्रती ),
सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन क्रमांक ३५ ( ५ प्रती ),
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती.
* पत्राने.

---------